**पुण्यश्लोक अहिल्यादेवी महाराष्ट्र मेंढी व शेळी विकास महामंडळ लि.पुणे यांना सन २०१७-१८ करिता सहाय्यक अनुदानाचा पहिला हप्ता मंजूर करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

**कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग,**

**शासन निर्णय क्रमांक : बियुडी-२७१७/ प्र.क्र.७७/ पदुम-३**

मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरू चौक

मंत्रालय विस्तार, मुंबई-४०००३२.

दिनांक :- १७ मे,२०१७

वाचा :-

१. वित्त विभाग शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०१७/प्र.क्र.७५/अर्थ-३, दि.१८.०४.२०१६.

२. कृषि व पदुम विभाग शासन निर्णय क्र.लेखानु-२०१७/प्र.क्र.१३३/पदुम-१६, दि.१९.४.२०१६

**शासन निर्णय :-**

सन २०१७-१८ चे महाराष्ट्र विनियोजन विधेयक २०१७, यास विधानमंडळाने मंजूरी दिलेली आहे. या अधिनियमान्वये आर्थिक वर्ष सन २०१७-१८ च्या माहे डिसेंबर,२०१७ पर्यंतच्या नऊ महिन्यांचा खर्च भागविण्यासाठी योजनेतर व योजनांतर्गत अर्थसंकल्पित निधी एकूण वार्षिक तरतूदीच्या ८०% च्या मर्यादेत वितरीत करण्यास वित्त विभागाने मंजूरी प्रदान केली आहे. तसेच भांडवली योजनांकरीता १००% निधी वितरीत करण्यास मान्यता प्रदान करण्यात आलेली आहे.

२. पुण्यश्लोक अहिल्यादेवी महाराष्ट्र मेंढी व शेळी विकास महामंडळ, पुणे यांना मेंढी पैदास प्रक्षेत्र चालू ठेवण्यासाठी व महामंडळाकडे वर्ग करण्यात आलेल्या कर्मचाऱ्यांचे वेतन व इतर अनुषंगिक खर्च भागविण्यासाठी तसेच महामंडळाच्या विकासात्मक योजनेवरील खर्च भागविण्यासाठी सन २०१७-१८च्या अर्थसंकल्पामध्ये वेतनेतर या उद्दिष्टाखाली रू.६५.००लक्ष (रू.पासष्ट लक्ष फक्त) आणि वेतन या उद्दिष्टाखाली रू.१०.०५८६ कोटी (रू.दहा कोटी पाच लाख शहाऐशी हजार फक्त) अशी एकूण रू.१०.७०८६ कोटी (रू.दहा कोटी सत्तर लाख शहाऐशी हजार फक्त) एवढी सहाय्यक अनुदानासाठी तरतूद करण्यात आली आहे.

३. वित्त विभागाने दि.१८ एप्रिल, २०१७ च्या परिपत्रकान्वये सन २०१७-१८ मध्ये एकूण अर्थसंकल्पित निधीपैकी "३६-सहायक अनुदाने (वेतन)" या बाबीखाली प्रथम नऊमाही करिता (एप्रिल,२०१७ ते डिसेंबर,२०१७) ८०% च्या मर्यादेत तसेच "३१-सहायक अनुदाने (वेतनेतर)" या बाबीखाली मंजूर असलेल्या निधीच्या ८०% च्या मर्यादेत बीडीएसवर वितरीत करण्यास मान्यता दिलेली आहे. त्यानुसार महाराष्ट्र मेंढी व शेळी विकास पुण्यश्लोक अहिल्यादेवी महामंडळ, पुणे यांना मागणी क्र.डी-४, २४०३ पशुसंवर्धन यालेखाशिर्षाखाली एप्रिल-२०१७ ते डिसेंबर -२०१७ या कालावधीसाठी "वेतन" या उद्दिष्टाखाली रू.८०४.६४ कोटी (रू.आठ कोटी चार लाख चौसष्ट हजार फक्त) व "वेतनेतर" या उद्दिष्टाखाली रू.५२.०० लक्ष (रू.बावन्न लक्ष) पुढे दर्शविल्यानुसार तरतूद बिडीएसवर वितरीत करण्यात येत आहे.

**(रक्कम लक्षात)**

| अ.क्र | लेखाशिर्ष बाब | महिना | वेतन | वेतनेतर |
|---|---|---|---|---|
| | मागणी क्र.डी- ४<br>२४०३ पशुसंवर्धन<br>१०४ मेष व लोकर विकास<br>(०१)(०२)पुण्यश्लोक अहिल्यादेवी महाराष्ट्र मेंढी व शेळी विकास महामंडळ<br>२४०३ ०६४१ | एप्रिल-१७ | ८३.८२ | ५.७७ |
| | | मे-१७ | ८३.८२ | ५.७७ |
| | | जून-१७ | ९१.०० | ५.७७ |
| | | जुलै-१७ | ९१.०० | ५.७७ |
| | | ऑगस्ट-१७ | ९१.०० | ५.७७ |
| | | सप्टेंबर-१७ | ९१.०० | ५.७७ |
| | | ऑक्टोबर-१७ | ९१.०० | ५.७७ |
| | | नोव्हेंबर-१७ | ९१.०० | ५.७७ |
| | | डिसेंबर-१७ | ९१.०० | ५.८४ |
| | एकूण | | ८०४.६४ | ५२.०० |

४. उपरोक्त मंजूर केलेला निधी काढून पुण्यश्लोक अहिल्यादेवी महाराष्ट्र मेंढी व शेळी विकास महामंडळ, पुणे यांना अदा करण्याचे अधिकार लेखाधिकारी, आयुक्त पशुसंवर्धन यांचे कार्यालय, पुणे यांना प्रदान करण्यात येत आहेत.

५. महालेखापाल, महाराष्ट्र-१, मुंबई व महालेखापाल, महाराष्ट्र-२, नागपूर यांच्या सूचनेनुसार पुण्यश्लोक अहिल्यादेवी महाराष्ट्र मेंढीव शेळी विकास महामंडळ, पुणे यांचे लेखा व तत्संबधी सर्व कागदपत्रे लेखापरिक्षा पथकासमोर परिक्षणासाठी आवश्यक तेव्हा सादर करावीत.तसेच महालेखापाल, महाराष्ट्र-१, मुंबई यांना सादर करण्यासाठी उपरोक्त अनुदानाची उपयोगिता प्रमाणपत्रे विनाविलंब (४ प्रतीत) शासनास सादर करावीत.

६. सदर खर्च करताना शासन परिपत्रक, वित्त विभाग क्रमांक-खर्चाने-१०.०६/प्र.क्र.१/अर्थोपाय, दि.२०.४.२००६ व त्यासोबतच्या वित्त विभागाच्या दि.१७.५.१९९१ व दि.४ मे,२००० च्या परिपत्रकात नमूद केलेल्या सूचनांचे काटेकोरपणे पालन करण्यात यावे.

७. सदरचा शासन निर्णय, वित्त विभाग परिपत्रक क्र.अर्थसं-२०१७/प्र.क्र.७५/अर्थ-३, दि.१८.०४.२०१६ अन्वये प्रशासकीय विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारांमध्ये निर्गमित करण्यात येत आहे.

८. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१७०५१७११२१२८१६०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Vikas Tulshiram Kadam

Digitally signed by Vikas Tulshiram Kadam
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Agriculture and ADF Dept, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=9869ec61c857e78e82b7a19b04c6d22f8ef1b8dbc9b19d45ef776d80ef148059, cn=Vikas Tulshiram Kadam
Date: 2017.05.18 16:58:53 +05'30'

**(विकास तु. कदम)**
अवर सचिव,महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१. आयुक्त ,पशुसंवर्धन, महाराष्ट्र राज्य, पुणे-६७

२. व्यवस्थापकीय संचालक, पुण्यश्लोक अहिल्यादेवी महाराष्ट्र मेंढी व
शेळी विकास महामंडळ,पुणे-१६.

३. महालेखापाल कार्यालय, महाराष्ट्र-१/२ (लेखा व अनुज्ञेयता/ लेखापरिक्षा), मुंबई/नागपूर.

४. वरिष्ठ कोषागार अधिकारी,पुणे.

५. कक्ष अधिकारी, (पदुम-१६) कृषि व पदुम विभाग, मंत्रालय,मुंबई-३२.

६. निवडनस्ती